महाराष्ट्र शासन

क्र.मविप-१४११/प्र.क्र.२२६/१४-अ
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८ नोव्हेंबर २०११

वाचा :- सामान्य प्रशासन विभाग आदेश क्र.मविप-१४११/प्र.क्र.२२६/१४-अ,
दिनांक ८ नोव्हेंबर २०११

## आदेश

मंत्रालयीन विभागातील व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयातील लिपिक, लिपिक-टंकलेखक व टंकलेखक या संवर्गातील कर्मचाऱ्यांना सहायकांच्या पदावर निवडीद्वारे नियुक्ती देण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत दिनांक २१ ऑगस्ट २०११ रोजी मर्यादित विभागीय परीक्षा-२०११ घेण्यात आली होती. सदर परीक्षेत अर्हताप्राप्त ठरलेल्या व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने ज्यांची शिफारस सहायक पदावर नेमणूकीसाठी केली आहे, अशा ५४ उमेदवारांपैकी ४९ उमेदवारांचे सहायक पदावरील निवडीने नियुक्तीकरीता नियतवाटप समक्रमांक दिनांक ८.११.२०११ च्या आदेशान्वये करण्यात आले आहे.

२. ज्या मागासवर्गीय उमेदवारांची जाती वैधता प्राप्त झाली नव्हती त्या उमेदवारांचे नियतवाटप करण्यात आले नव्हते. आयोगाने शिफारस केलेल्या खाली नमूद उमेदवाराची जाती वैधता प्रमाणपत्र पडताळणी झाली आहे. यास्तव त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या विभागात त्यांचे नियतवाटप करण्यात येत आहे.

| अ. क्र. | श्री/ श्रीमती | नांव | गु. क्र. | वर्ष | प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री | केळसकर सुधीर शंकर | ५१ | २०११ | भज-ब | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग |

* संबंधित उमेदवारांचा मूळ प्रवर्ग भज-ब असून, अंतर्गत परिवर्तनानुसार त्यांची नियुक्ती विजा-अ च्या आरक्षित पदावर झालेली आहे.

३. श्री.केळसकर यांनी सहायक पदावरील नियुक्तीचा स्वीकार या आदेशाच्या तारखेपासून सात दिवसांत करावा. तसेच, श्री.केळसकर यांचे नेमणूकीचे आदेश विभागाने तात्काळ निर्गमित करुन आदेशाची प्रत या विभागास उपलब्ध करुन द्यावी.

४. श्री.केळसकर यांनी विहित मुदतीत नियुक्तीचा स्वीकार केला तर त्यांची ज्येष्ठता संदर्भाधिन आदेशाच्या तारखेपासून धरण्यात येईल व त्यांची आपापसातील ज्येष्ठता त्यांच्या गुणवत्ता क्रमांकानुसार धरण्यात येईल. विहित मुदतीनंतर नियुक्ती स्वीकारली तर त्यांची ज्येष्ठता अबाधित राहणार नाही.

५. श्री.केळसकर हे सेवा प्रवेश नियमानुसार व सा.प्र.वि.क्र.मविप १४१०/प्र.क्र.१४५/१०/१४-अ, दिनांक ११.७.२०११ च्या परिपत्रकानुसार सर्व अटींची पूर्तता करीत असल्याचे विभागाने प्रमाणित केले आहे. यास्तव त्यांचे नियुक्तीचे आदेश निर्गमित करताना विभागाने त्याबाबतची खात्री करावी. त्यासाठी श्री.केळसकर यांचे आवेदनपत्र सोबत जोडले आहे.

६. श्री.केळसकर यांची सहायक पदावरील पदस्थापना त्यांचेविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही, या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

७. हे आदेश तात्काळ अंमलात येतील, संबंधित उमेदवारांनी त्यांच्या पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या विनंतीची दखल घेण्यात येणार नाहीत याची नोंद घ्यावी.

८. हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१११११८१०३११०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सु. मो. महाडिक)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

श्री.सुधीर शंकर केळसकर, लिपिक-टंकलेखक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

प्रत,

सचिव, (आस्थापना), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
सह/उप सचिव (आस्थापना), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
निवड नस्ती/संग्रहार्थ